**मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प ),जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयाच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि. ०१/१०/२०१८ ते २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०१८/( १६५/ २०१८ ) /मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०१/११ /२०१८

**<u>पहावे</u>**-१) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक- मुदतवाढ -२०१८/( १६५/ २०१८ ) /मोप्र-(२) , दि. ०१/०६/२०१८

२) मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प ), जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र.क्र. जसंवि/(विप्र)/आस्था-२ /मुदतवाढ प्रस्ताव/३०९२/२०१८, दिनांक ८ /०९/ २०१८

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ७ सप्टेंबर, २०१८

४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक_आढावा २००८(९९/२००८ )/भाग-२/( आ (प्रशि), दिनांक २९ मे, २००८ व शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक_आढावा २००८( ९९/२००८ )/भाग-२/ आ (प्रशि), दिनांक ३० जून, २००९

**<u>प्रस्तावना :-</u>**

मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांची निर्मिती संदर्भाधिन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ३०/०९/२०१८ पर्यत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती . संदर्भ क्रमांक ३ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना १/१०/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प ) जलसंपदा विभाग, अमरावती यांचे संदर्भ क्र. २ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आता मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांपैकी उपलब्ध करुन दिलेल्या ३० पदांना सोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ०१/१०/२०१८ते २८/०२/२०१९ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

२) उपरोक्त कार्यालयातील खर्च, मागणी क्रमांक आय-५ (नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष- ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च,८० सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे , (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भागभांडवली अंशदान (वेतन) (०४) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान ( ४७०१ आय १७१) या लेखाशीर्षाखाली महामंडळास मंजूर असलेल्या नियत अस्थाई आस्थापनेच्या वेतनाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३) हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०७/०९/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार तसेच आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८११०११५१३५७८४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.11.01 15:20:22 +05'30'

सहपत्र- परिशिष्ट 'अ'

**( म. ई. धरणे )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत- सहपत्रासह-

१. महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
२. महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखापरीक्षा ) नागपूर,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
४. वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,
५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर
६. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प जलसंपदा विभाग, अमरावती यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी /कर्मचा-यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीच्या प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील, याची कृपया नोंद घ्यावी.
७. मोप्र-(२) कार्यासन, संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ -२०१८/( १६५ /२०१८ ) /मोप्र-(२), दिनाक ०१/११/२०१८ चे सहपत्र नियत अस्थायी आस्थापनेवरील खालील नमूद ३० पदांना दिनांक १.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ**

| अ.क्र. | पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | . |
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता | ३ | ३ |
| ५ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ६ | विशेष अधीक्षक | १ | १ |
| ७ | अधीक्षक | १ | १ |
| ८ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघुलेखक उच्चश्रेणी/निम्नश्रेणी | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनीचालक | १ | १ |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |
| | **एकूण मुदतवाढीची पदे -३०** | | |